**NEP टास्क्स राज्य समन्वय कक्ष येथील उपसंचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे येथे प्रतिनियुक्तीने पदस्थापना देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांक:-प्रतिनी-२६२४/प्र.क्र.७३/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १३ मार्च, २०२४ .

<u>वाचा :-</u>

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचा शा. नि. क्र.संकिर्ण- २०२२ /प्र.क्र.४९/एसडी-६, दि.२४.०६.२०२२.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभागचा शा.नि. क्र.निसूची -३६२३/प्र.क्र.२१७/प्रशा-२, दि.०३.०१.२०२४.

<u>प्रस्तावना :-</u>

वाचा येथील क्र.१ अन्वये "राष्ट्रीय शैक्षणिक धोरण, २०२० अंमलबजावणीसाठी निश्चित करण्यात आलेल्या कार्याबाबत समिती गठीत करण्यात आली आहे. नवीन राष्ट्रीय शैक्षणिक धोरणाच्या अंमलबजावणीसाठी राष्ट्रीय शैक्षणिक धोरणातील शिफारशीनुसार टप्पा-टप्याने कार्यवाही सुरु आहे. राष्ट्रीय व राज्यस्तरावरील विविध संस्थांची जबाबदारी व त्यानुसार करावयाची आवश्यक कार्यवाही याबाबत एकूण २९७ कार्य अंतिम करण्यात आली आहेत. सदर सर्व कार्ये अंमलबजावणी तात्काळ करावयाची आहे. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी NEP टास्क्स राज्य समन्वय कक्ष स्थापन केला आहे. टास्क्स राज्य समन्वय कक्षाचे कार्य जलद गतीने होण्याकरिता डॉ. नेहा बी.बेलसरे यांना उपसंचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे येथे प्रतिनियुक्तीने पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>**शासन आदेश-**</u>

शालेय शिक्षण विभागाच्या दिनांक २४.०६.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये गठीत केलेल्या समितीचे काम जलदगतीने होण्याकरिता डॉ.नेहा बी.बेलसरे, प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, पुणे यांची उपसंचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे पदावर प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात येत आहे.

२. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्विकारावा तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी या आदेशाप्रमाणे प्रतिनियुक्ती झालेले अधिकारी विहित कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होतील. याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३१३१५२१५७११२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJAY NIVRUTTI BHOSALE

Digitally signed by VIJAY NIVRUTTI BHOSALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION ND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=c7a4e31cd0e0c9eec89f89869f2dd675d71f0636b0a2ea82e485826669926889, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7966FB8DA6E03C3F79409670C65FAC077378A68F734A11D051D02DC3119DC128, cn=VIJAY NIVRUTTI BHOSALE
Date: 2024.03.13 16:15:03 +05'30'

**( विजय भोसले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
२) प्रधान सचिव (शालेय शिक्षण विभाग), यांचे स्वीय सहायक.
३) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
४) सर्व शिक्षण संचालक
५) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
६) संबंधित अधिकारी ( आयुक्त शिक्षण यांचे कार्यालया मार्फत)
७) निवडनस्ती.